**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या उपशिक्षणाधिकारी व तत्सम, गट ब संवर्गातील उमेदवारांच्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत प्रशिक्षण घेणा-या प्रशिक्षणार्थींच्या वेतनाच्या लेखाशीर्षात बदल करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन शुद्धीपत्र, क्रमांक- ससप्रे-४४१९/प्र. क्र.१८९/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०३ जूलै, २०२०

संदर्भ :-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक- टिआरएन २०१३/प्र.क्र.८४/१३/ १२-अ, दिनांक २० जानेवारी, २०१४
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक- पदनि २०१६/प्र.क्र. ७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २० फेब्रुवारी, २०१६
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. विंदूना-३०१६/प्र.क्र.२००/प्रशा-२, दिनांक १७.११.२०१७
४) शासन शुध्दीपत्र, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. विंदूना-३०१६/प्र.क्र.२००/प्रशा-२, दिनांक १२.१२.२०१७
५) शासन निर्णय, क्रमांक- ससप्रे-४४१९/प्र. क्र.१८९/प्रशा-२ दिनांक ०६.१२.२०१९

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षांच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्याअनुषंगाने उपशिक्षणाधिकारी व तत्सम, गट ब संवर्गामध्ये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षा- च्या अंतिम निकालाच्या आधारे निवड झालेल्या व एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम मध्ये प्रशिक्षण घेणाऱ्या उमेदवारांच्या वेतनाकरिता वापरण्यात येणा-या लेखाशीर्षामध्ये तरतूद कमी पडत असल्याचे व त्यामुळे मागील काही महिन्यांपासून सदर प्रशिक्षणार्थींचे वेतन नियमितपणे होत नसल्याचे आयुक्त शिक्षण यांनी आपल्या दिनांक ३०.०६.२०२० च्या पत्रान्वये कळविले आहे. २२०२१०९१ हे लेखाशीर्ष गटशिक्षणाधीकारी व तत्सम अधिका-यांच्या वेतनाकरिता वापरले जात असल्याने सदर परिविक्षाधीन उपशिक्षणाधिकारी यांचे थकीत वेतन व नियमित वेतन यापुढे २२०२००२१ या लेखाशीर्षा ऐवजी “२२०२ सर्वसाधारण शिक्षण ८० सर्वसाधारण ००१ संचालन व प्रशासन (००) (०१)शिक्षण संचालक ( २२०२१०९१)” या लेखाशिर्षाखालील मंजूर

तदतूदीतून करणेबाबत विभागाच्या दिनांक ०६.१२.२०१९ च्या शासन निर्णयास शुद्धीपत्रक काढणेची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सबब विभागाच्या दिनांक ०६.१२.२०१९ च्या शासन निर्णयात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

**शुद्धीपत्र :-**

दिनांक ०६.१२.२०१९ च्या शासन निर्णयामध्ये

"उपशिक्षणाधिकारी व तत्सम, गट ब संवर्गातील सदर ५४ अधिसंख्य पदांच्या वेतनावर येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण-०१-प्राथमिक शिक्षण, १०४ निरीक्षण (००) (०१) प्राथमिक शाळांची तपासणी,अनिवार्य २२०२००२१" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१९-२० या वित्तिय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा."

ऐवजी

"उपशिक्षणाधिकारी व तत्सम, गट ब संवर्गातील अधिसंख्य पदांच्या वेतनावर येणारा खर्च या विभागाच्या "मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण ८० सर्वसाधारण ००१ संचालन व प्रशासन (००) (०१)शिक्षण संचालक(अनिवार्य) ( २२०२१०९१)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधीत वित्तिय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा."

असे वाचावे.

२. सदर शासन शुद्धीपत्र महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक क्रमांक २०२००७०३१५०२१५११२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK VIJAY SHELAR

Digitally signed by DEEPAK VIJAY SHELAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=6cd30ed620a4fe01f24cb84cc86e70f3b8f6f1fdcdb2469570c78dabb9acf4ba, postalCode=400032, street=ROOM NO 4.4,ANNEX BLDG,SCHOOL EDUCATION DEPT.MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DEEPAK VIJAY SHELAR
Date: 2020.07.03 15:54:14 +05'30'

**( दीपक शेलार)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल - १ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
२. महालेखापाल - १ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई ४०० ०२०.
३. महालेखापाल - २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर

४. महालेखापाल - २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
५. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
८. महासंचालक, वंसतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर - ४४२ ४१०.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर.
११. कक्ष अधिकारी (प्रशा-५), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा - १), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती.